**विश्वबाळा सामाजिक बहु.सेवाभावी संस्था, पलूस, जि.सांगली संचलित १) गरिब नवाज निवासी मुकबधीर विद्यालय, पारे, ता.खानापूर, जि.सांगली, २) जय भवानी निवासी मतिमंद विद्यालय, पलुस, जि.सांगली, ३) ईश्वरसेवा निवासी मतिमंद कार्यशाळा, पलूस, जि.सांगली या अनुदानित शाळा/कार्यशाळांस अनुज्ञेय पदांना मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. इडीडी-२०१९/प्र.क्र.१४/दि.क.१**
३१, ३२, ३५ ए, मित्तल टॉवर, ए-विंग, तिसरा मजला
बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.
दिनांक :- ११ मार्च, २०२४.

**वाचा**:- १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२००३/प्र.क्र.३४०/भाग-३/सुधार-२, दि.१८ ऑगस्ट, २००४.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.२८८/ दि.क.१, दि.१८.०७.२०१८ व शासन शुध्दीपत्रक दि.०५.०२.२०१९.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२०१९/प्र.क्र.१४ /दि.क.१, दि.१५ जुन, २०१९.
४) मा.उच्चस्तर सचिव समितीच्या दि.२६.०९.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त दि.२०.०२.२०२४.
५) दिव्यांग कल्याण विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२०२१/प्र.क्र.७१/दि.क.१, दि.०३.०१.२०२४.

**प्रस्तावना :-**

विश्वबाळा सामाजिक बहु.सेवाभावी संस्था, पलूस, जि.सांगली संचलित १) गरिब नवाज निवासी मुकबधीर विद्यालय, पारे, ता.खानापूर, जि.सांगली, २) जय भवानी निवासी मतिमंद विद्यालय, पलुस, जि.सांगली, ३) ईश्वरसेवा निवासी मतिमंद कार्यशाळा, पलूस, जि.सांगली या विशेष शाळा/कार्यशाळांना वाचा क्र.३ अन्वये वित्त विभागाच्या मान्यतेच्या अधीन राहून अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर तिनही अनुदानित विशेष शाळांना शासन निर्णय दि.१८.०८.२००४ च्या आकृतीबंधाप्रमाणे अनुज्ञेय ठरणाऱ्या पदांना मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयानुसार उक्त शाळा/कार्यशाळांना पदमान्यता मिळण्याच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालयात दाखल अवमान याचिका क्र.३३६/२०२२ प्रकरणी दि.२८.०६.२०२३ रोजी मा.उच्च न्यायालयाने संस्थेचा पदमान्यतेबाबतचा प्रस्ताव दि.२८.०७.२०२३ पूर्वी उच्चस्तरीय सचिव समितीसमोर सादर करण्याचे निर्देश दिले. त्यानुषंगाने विभागाद्वारे प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला. याप्रकरणी दि.२६.०९.२०२३ रोजी झालेल्या मा.उच्चस्तर

सचिव समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने दि.२०.०२.२०२४ रोजी निर्गमित कार्यवृत्तास अनुसरून उक्त तिनही अनुदानित विशेष शाळा/कार्यशाळांना शासन निर्णय दि.१८.०८.२००४ च्या आकृतीबंधानुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या खाली नमूद तक्त्यानुसार पदे निर्माण करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

| अ. क्र. | पदनाम | गरीब नवाज निवासी मुकबधीर विद्यामंदीर, पारे, ता.खानापूर, जि.सांगली | जय भवानी निवासी मतिमंद विद्यालय, पलूस, जि.सांगली | ईश्वरसेवा निवासी मतिमंद कार्यशाळा, पलूस, जि.सांगली |
|---|---|---|---|---|
| १. | मुख्याध्यापक<br>एस-१४: ३८६००-१२२८०० | १ पद | १ पद | १ पद (व्यवस्थापकीय अधिक्षक) |
| २. | विशेष शिक्षक<br>एस-१०: २९२००-९२३०० | १० पदे | १० पदे | ६ पदे (निदेशक) |
| ३. | शारिरिक शिक्षण/ निदेशक कला, हस्त व्यवसाय शिक्षक<br>एस-१०: २९२००-९२३०० | ३ पदे | ३ पदे | - |
| ४. | निम वैद्यकीय कर्मचारी (मानस शास्त्रज्ञ/ व्यवसाय उपचार तज्ञ/ भौतीकोपचार तज्ञ)<br>एस-१४: ३८६००-१२२८०० | १ पद (स्पिच थॅरापिस्ट) | १ पद | - |
| ५. | काळजीवाहक<br>सदर पद दरमहा रु.२०००/- प्रमाणे प्रथम ३ वर्षांकरीता व ३ वर्षानंतर नियमित वेतनश्रेणी<br>रु.२५५०-३२००<br>एस-१: १५०००-४७६०० | १ पद | ३ पदे | - |
| ६. | कार्यशाळा मदतनिस<br>एस-१: १५०००-४७६०० | - | - | ३ पदे |
| ७. | सफाईगार<br>(शासन निर्णय दि.०३.०१.२०२४ अन्वये वेतन, संबंधीत उपक्रम ज्या परिमंडळाच्या क्षेत्रामध्ये येतो, त्या परिमंडळातील कार्यालयांना अनुज्ञेय असलेल्या दरानुसार निश्चित करण्यात यावे.) | १ पद | १ पद | - |
| ८. | मानद वैद्यकीय अधिकारी | १ पद | १ पद | - |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | रु.१०,०००/-दरमहा एकत्रीत वेतन | | | |
| ९ | पुनर्वसन सामाजिक कार्यकर्ता नि से.योजन अधिकारी<br>रु.१०००/- एकत्रित वेतन दरमहा | - | - | १ |
| | **कार्यालय विभाग** | | | |
| १० | कनिष्ठ लिपिक नि लेखापाल<br>एस-६: १९९००-६३२०० | १ पद | १ पद | १ पद |
| ११ | शिपाई<br>एस-१ : १५०००-४७६०० | १ पद | १ पद | - |
| | **वसतीगृह विभाग** | | | |
| १२ | अधिक्षक/गृहपाल<br>एस-६: १९९००-६३२०० | १ पद | १ पद | १ पद<br>(गृहपाल) |
| १३ | स्वयंपाकी<br>एस-३: १६६००-५२४०० | २ पदे | २ पदे | २ पदे |
| १४ | राखणदार / काळजीवाहक<br>सदर पद दरमहा रु.२००० प्रमाणे प्रथम ३ वर्षाकरीता व ३ वर्षांनंतर नियमित वेतनश्रेणीमध्ये<br>रु.२५५०-३२००<br>एस-१: १५०००-४७६०० | ३ पदे | ५ पदे | ५ पदे |
| १५ | मदतनीस<br>(शासन निर्णय दि.०३.०१.२०२४ अन्वये वेतन, संबंधीत उपक्रम ज्या परिमंडळाच्या क्षेत्रामध्ये येतो, त्या परिमंडळातील कार्यालयांना अनुज्ञेय असलेल्या दरानुसार निश्चित करण्यात यावे.) | १ पद | १ पद | १ पद |
| १६ | पहारेकरी<br>(शासन निर्णय दि.०३.०१.२०२४ अन्वये वेतन, संबंधीत उपक्रम ज्या परिमंडळाच्या क्षेत्रामध्ये येतो, त्या परिमंडळातील कार्यालयांना अनुज्ञेय असलेल्या दरानुसार निश्चित करण्यात यावे.) | १ पद | १ पद | १ पद |
| १७ | सफाईगार<br>(शासन निर्णय दि.०३.०१.२०२४ अन्वये वेतन, संबंधीत उपक्रम ज्या | १ पद | १ पद | १ पद |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | परिमंडळाच्या क्षेत्रामध्ये येतो, त्या परिमंडळातील कार्यालयांना अनुज्ञेय असलेल्या दरानुसार निश्चित करण्यात यावे.) | | | |
| १८ | परिचारीका<br>एस-८: २५५००-८११०० | - | १ पद | -- |
| | **एकूण** | **२९ पदे** | **३४ पदे** | **२३ पदे** |

२. सबब मा.उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेस अनुसरून उक्त तिनही शाळा/कार्यशाळांना परिच्छेद क्र.१ मधील तक्यानुसार एकूण ८६ पदे निर्माण करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) सदर तिनही शाळा/कार्यशाळांना शासनाने वेळोवेळी लागू केलेले नियम अंमलात आणणे बंधनकारक राहतील.

२) शिक्षकीय व शिक्षकेतर पदभरतीसाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.२८८/अ.क.-१, दि. १८ जुलै, २०१८ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र. इडीडी-२०१८/प्र.क्र.२८८/अ.क.-१, दि. ५ फेब्रुवारी, २०१९ मध्ये नमुद नियम व सेवाभरती नियमाप्रमाणे पद भरती करणे बंधनकारक राहील. अन्यथा सदरची भरती प्रक्रीया अवैध समजण्यात येईल. तसेच संबंधितांवर नियमानुसार कायदेशिर कारवाई करण्यात येईल. तथापि, सदरच्या विहीत प्रक्रीयेस बगल देऊन संस्थेने नियुक्ती आदेश दिल्यास आणि त्यास संबंधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांनी मान्यता दिल्यास, संबंधीत जिल्हा समाजकल्याण अधिकारी, हे सर्वस्वी जबाबदार राहतील.

३) शिक्षकीय व शिक्षकेतर पदांची पदभरती करताना नवीन आरक्षण धोरणानुसार मागासवर्गीय आरक्षण कक्षाकडून आरक्षणे निश्चित करुन घेतलेली असावी व अशा आरक्षण निश्चित करुन घेतलेल्या बिंदुनामावलीनुसारच पदभरती करण्यात यावी.

४) शिक्षकीय व शिक्षकेतर या संवर्गातील पदभरतीसाठी मागासवर्गीय कक्षाकडून आरक्षण निश्चित करुन घेतलेली असावी. अशी आरक्षण निश्चित करुन घेतलेली पदे बिंदुनामावलीनुसारच भरण्यात यावीत. प्रवर्गनिहाय सामाजिक आरक्षणे, सामाजिक आरक्षणाव्यतिरिक्त आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक आरक्षण व समांतर आरक्षण (महिला, खेळाडू, दिव्यांग, इ.) तपासूनच पदभरती करण्यात यावी.

५) शिक्षकीय पदे भरतांना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. इडीडी-२०१८/प्र.क्र.२८८/अ.क.-१, दि. १८ जुलै, २०१८ तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र. इडीडी-२०१८/प्र.क्र.२८८/अ.क.-१, दि. ५ फेब्रुवारी, २०१९ मधील विहीत तरतुदी विचारात घेऊन तसेच, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.इडीडी-२००३/प्र.क्र.३४०/भाग-३/सुधार-२, दि. १८ ऑगस्ट, २००४ मध्ये नमूद पदांसाठी आवश्यक असलेली शैक्षणिक अहर्ता/पात्रता आणि शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६) सदर पदांची नियुक्ती करताना प्रचलित कायद्यानुसार शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या विहीत निवड समितीमार्फतच निवड करण्यात यावी. विहीत कार्यपद्धतीचा अवलंब

न करता केलेली भरती रद्द करण्यात येईल व नियुक्तीच्यासंदर्भात भविष्यात न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित संस्था, जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांची राहील.

(७) शिक्षकीय व शिक्षकेतर पदांच्या निवड प्रक्रियेसाठी प्रचलित नियमातील तरतुदींचा विचार करुन उमेदवारांची पात्रता निश्चित करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील. तसेच प्रचलित नियमास बगल देऊन नियुक्ती देण्यात आल्यास, संबंधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी, आयुक्त, दिव्यांग कल्याण व संबंधीत संस्था/ प्राचार्य/व्यवस्थापन हे सर्वस्वी जबाबदार राहतील.

(८) शिक्षकीय व शिक्षकेतर पदे भरताना महाराष्ट्र शासनाने वेळोवेळी निर्धारित केलेल्या अर्हता, अनुभव, व्यावसायिक पात्रता यांचे तंतोतंत पालन करून, सदरची पदभरती करण्यात यावी. याबाबतीत अनियमितता झाल्यास त्याला सर्वस्वी प्रशासकीय मान्यता देणारे जिल्हा समाजकल्याण अधिकारी, आयुक्त, दिव्यांग कल्याण व संस्थेचे व्यवस्थापन जबाबदार राहतील.

(९) विहीत नियम व प्रक्रिया पाळून नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यास, ते या प्रक्रियेअंतर्गत ज्या दिवशी अधिकृतपणे रुजू होतील, त्या दिवसापासून सेवेत रुजू झाल्याचे समजण्यात येईल.

(१०) मंजूर पदे भरताना शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. मंजूर पदांची पदभरतीची प्रक्रिया तीन महिन्याच्या आत पूर्ण करणे संबंधीत संस्थेस बंधनकारक राहील व समितीने मान्यता दिलेल्या सर्व अनुज्ञेय पदांची भरती प्रक्रिया संबंधीत संस्थेने विहीत वेळेत पूर्ण केल्यानंतर एक महिन्याच्या आत याबाबतचा अहवाल आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी शासनास सादर करावा.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १० सप्टेंबर, २००१ अन्वये गठीत उच्चस्तर सचिव समितीच्या दि.२६.०९.२०२३ रोजी झालेल्या सन २०२३ मधील ६ व्या बैठकीमधील दिलेल्या निर्देशांच्या अनुषंगाने दि.२०.०२.२०२४ रोजीच्या इतिवृत्त व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.अनौसं ११८/आपुक, दि.२३.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१११६४२२६४०३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPT., 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AB69D6945F8950A9525831F8AE9726BE295D17576E78D19FA8F6CB952BB04A0, cn=VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2024.03.11 16:51:28 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक.

३) सचिव (दिव्यांग कल्याण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, पुणे.

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद-सांगली.

७) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हापरिषद- सांगली

८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

९) जिल्हा कोषाधिकारी, सांगली.

१०) अध्यक्ष / सचिव, विश्वबाळा सामाजिक बहु.सेवाभावी संस्था, पलूस, जि.सांगली

११) निवडनस्ती (दिव्यांग कल्याण -१)